**अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे यांच्या कार्यक्षेत्रातील ५ शासकीय आश्रमशाळा इमारत बांधकामांच्या अंदाजपत्रके व आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**शासन निर्णय क्रमांक : शाआबां-२००९/प्र.क्र.१४०/का.१३**
**आदिवासी विकास विभाग,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- २२ जून, २००९.**

<u>वाचा :</u> आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे पत्र क्र.इमा- २००८/ प्र.क्र.१/ का.८(२), दि.२६/२/२००९.

**<u>शासन निर्णय :</u>** आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी त्यांच्या दि.२६/२/२००९ च्या पत्रान्वये अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे यांचे कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, आहुपे, राजापूर, गोहे (बु.), आसाणे व तेरुंगण, ता.आंबेगाव, जि.पुणे येथे नवीन इमारत बांधकाम करण्याकरिता पाठविलेले अंदाजपत्रके व आराखडे प्रशासकीय मान्यतेसाठी सार्वजनिक बांधकाम विभागाकडे सादर करण्यात आली होती.

२. अंदाजपत्रक संबंधित उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग यांनी तयार केली आहेत व सक्षम अधिकारी म्हणून कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (उत्तर) पुणे/अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे तसेच मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी साक्षांकित केली आहेत.

३. सदर अंदाजपत्रके सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित आहेत. अंदाजपत्रकात आता आकस्मिक व संगणकीकरणासाठी तसेच भाववाढीसाठी १०%, रकमेची तरतूद समाविष्ठ करण्यात आली आहे. सदर शासकीय आश्रमशाळेंच्या अंदाजपत्रकात आवश्यक त्या सुधारणा/दुरुस्त्या केल्यानंतर खालील अटींच्या अधिन राहून अंदाजपत्रकांना खालीलप्रमाणे सुधारीत किंमतीस सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दिलेली आहे.

| अ.क्र. | प्रकल्प | शासकीय आश्रमशाळेचे नांव | | तालुका/ जिल्हा | अंदाजपत्रकीय रक्कम | कामाचा तपशिल |
|---|---|---|---|---|---|---|
| | घोडेगांव | १ | आहुपे | आंबेगाव, पुणे | रु.६,३९,९६,६००/- | नवीन टाईपप्लॅन प्रमाणे इ.१ ली ते १० वी पर्यंतच्या इमारतींचे बांधकाम |
| | | | राजापूर | | रु.६,३१,३८,४००/- | |
| | | | गोहे (बु.) | | रु.६,३१,३८,४००/- | |
| | | | आसाणे | | रु.६,३२,३७,९००/- | |
| | | | तेरुंगण, | | रु.६,३१,३७,९००/- | |
| | | | **एकूण** | | **रु.३१,६६,४९,२००** | |

४. तथापि आकस्मिक व संगणकीकरणासाठी तसेच भाववाढीसाठी १०% रकमेची तरतूद वगळून अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे यांचे कार्यक्षेत्रातील उपरोक्त शाळांच्या इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास रु.२५,००,६४,४४१/- (रुपये पंचवीस कोटी, चौशष्ट हजार चारशे एकेचाळीस फक्त) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रक व आराखड्यास खालील अटींच्या आधिन राहून खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी :-**

अ) प्रस्तुत इमारतींची कामे वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मांडणी नकाशा तयार करुन घेतल्यावरच सुरु करावीत.

ब) पंपहाऊस व नमूना नकाशे जोडावेत तसेच अंतर्गत रस्ते व संरक्षण भिंत या कामाचा छेद नकाशा मापे व वावासह अंदाजपत्रकासोबत जोडावा.

क) जागा मालकी हक्काबाबतची सर्व कागदपत्रे जोडावीत.

ड) जुने इमारतींचे रुपांतर कर्मचारी निवासस्थानामध्ये करण्यात यावे तसेच,आंबेगांव,पुणे येथे दोन पाणीपुरवठा योजनेऐवजी एकच योजनेस मान्यता देण्यात येत आहे त्यामुळे शासकीय आश्रमशाळा राजूर ता. आंबेगांव, जिल्हा पुणे येथील पाणीपुरवठयासाठी अंदाजपत्रकात नमूद केलेली रु. ७.४० लक्ष इतकी रक्कम कमी करण्यास येत आहे.

| अ. क्र. | प्रकल्प | शासकीय आश्रमशाळेचे नांव | | तालुका/ जिल्हा | अंदाजपत्रकीय रक्कम | कामालचा तपशिल |
|---|---|---|---|---|---|---|
| | घोडेगांव | १ | आहुपे | आंबेगाव, पुणे | रु.५,००,५३,१३७/- | नवीन टाईपप्लॅन प्रमाणे इ.१ ली ते १० वी पर्यंतच्या इमारतींचे बांधकाम मुला/मुलींचे वसतिगृह व कर्मचारी निवासस्थान समाविष्ठ आहे. |
| | | | राजापूर | | रु.४,९२,५९,२८०/- | |
| | | | गोहे (बु.) | | रु.५,००,००,०००/- | |
| | | | आसाणे | | रु.५,००,११,३०४/- | |
| | | | तेरुंगण, | | रु.५,००,००,०००/- | |
| | | | **एकूण** | | **रु.२४,९३,२३,७२१/** | |

५. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने आणि शासन निर्णय वित्त विभाग क्र.विपअ-१००१/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११ जुलै, २००१ मधील भाग-पहिला, उपविभाग-पाच अनुक्रमां-१ नियम १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२००९०६२२१८१५२०००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( वि.पु.काळे )
कार्यासन अधिकारी

प्रति,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक (सोबत मुळ अंदाजपत्रक)
अपर आयुक्त, आदिवासी विकास,ठाणे .
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, घोडेगांव.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे (उत्तर)
कक्ष अधिकारी (का.७), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवारी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.